सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) (सर्वसाधारण) घटकांतर्गत प्राप्त केंद्र शासनाच्या हिश्श्याचा निधी रु.२६०,३०,५८,०००/- व राज्य समरुप हिस्सा रु.१७३,५३,७२,०००/- एवढा निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रआयो-२०२०/प्र.क्र.४५/योजना-१०**
बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
तारीख: १६ सप्टेंबर, २०२०

वाचा :-

१) उप सचिव (ग्रामीण गृहनिर्माण), ग्रामीण विकास मंत्रालय भारत सरकार, नवी दिल्ली यांचे क्र. J१२०२५/०१/२०१९-RH (A/C)-Maharashtra, दि.२१.०२.२०२० रोजीचे आदेश.

२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८.०७.२०१९.

३) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण गृहनिर्माण यांचे पत्र क्र. जा.क्र. २२६२/ न.क्र.२०१/ लेखा/(प्रआयो)/ २०१९, दि.२४.०२.२०२०.

**शासन निर्णय:-**

प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) सर्वसाधारण घटकांतर्गत केंद्र शासनाकडून सन २०१९-२० या वर्षात प्राप्त झालेला निधी रु. २६०,३०,५८,०००/- ( अक्षरी रुपये दोनशे साठ कोटी तीस लक्ष अठ्ठावन्न हजार फक्त ) व राज्य समरुप हिस्सा रु. १७३,५३,७२,०००/- (अक्षरी रुपये एकशे त्र्याहत्तर कोटी त्रेपन्न लक्ष बाहत्तर हजार फक्त ) असे मिळून एकूण रू. ४३३,८४,३०,०००/- ( अक्षरी रुपये चारशे तेहतीस कोटी चौऱ्याऐंशी लक्ष तीस हजार फक्त )एवढा निधी खर्च करण्यास व अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. केंद्र शासनाच्या हिश्श्याचा निधी सन २०२०-२१ या वर्षातील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा व मागणी क्र. एल-३, २५०५ ग्रामीण रोजगार, ६० इतर कार्यक्रम, ७०२ जवाहर ग्रामसमृध्दी योजना, (०१)प्रधानमंत्री आवास योजना, (०१)(०४) प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) -सर्वसाधारण (केंद्र पुरस्कृत योजना) ( केंद्राचा हिस्सा ६० %)( कार्यक्रम ) ३१ सहाय्यक अनुदाने, ( वेतनेतर) (२५०५ ३०१२), या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. तसेच राज्य शासनाच्या हिश्श्याचा निधी मागणी क्र. एल-३, २५०५ ग्रामीण रोजगार, ६० इतर कार्यक्रम, ७०२ जवाहर ग्रामसमृध्दी योजना, (०१)प्रधानमंत्री आवास योजना, (०१)(०१) प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) -सर्वसाधारण ( राज्याचा हिस्सा ४० %) (कार्यक्रम ) ३१ सहाय्यक अनुदाने, ( वेतनेतर) (२५०५ ०५६८), या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती कार्यासन योजना-२ यांना सादर करण्यात यावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा देयक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयात नोंद झालेल्या रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

४. प्रस्तुत निधीबाबत उपसंचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण-गृहनिर्माण हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून (संकेतांक क्रमांक १२०१००५१८३) तसेच संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण -गृहनिर्माण हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. सदर निधीचे देयके ठाणे कोषागार अंतर्गत उपकोषागार कार्यालय, कोकण भवन, बेलापूर येथे पारित करण्यात यावेत.

५. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आलेले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.२७६/का.१४४४, दि.१५.०७.२०२० तसेच वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.२२९/२०२०/व्यय-१५, दि.०३.०९.२०२० अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९१६१४५४१४८१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Hemant Sudhakar Pathak

Digitally signed by Hemant Sudhakar Pathak
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1a58924bb1ebc2ed6699e048bfa42ad41d1ed32de1e3eda84d0c03040473905e, cn=Hemant Sudhakar Pathak
Date: 2020.09.16 16:03:01 +05'30'

**(हे.सु.पाठक)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई (पाच जादा प्रतींसह)

२) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, कम्बाटा इमारत, ४२ महर्षी कर्वे रोड चर्चगेट, मुंबई.

३) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे

४) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन बेलापूर

५) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

६) वित्त विभाग (व्यय-१५) व (अर्थ-१७) मंत्रालय मंबई-३२.

७) कार्यासन अधिकारी, वित्त-७, वित्त-१, योजना-१, योजना-२, योजना-५ व योजना-७, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई.

८) निवड नस्ती (योजना-१०)